**महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंळामार्फत राबविण्यात येणा-या थेट कर्ज योजनेच्या कर्जाची मर्यादा रु.२५,०००/- वरुन रु.१,००,०००/- पर्यंत वाढविण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एमपीसी-२०१७/प्र.क्र.२७४/महामंडळे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २१ डिसेंबर, २०१८.

**वाचा :-**

१. सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र :- महामं ००४/ प्र.क्र.३८/विघयो-२ दि.३०/११/२००४,
२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन, निर्णय क्र. एमपीसी-२०१७/प्र.क्र.२७४/महामंडळे दि. ०५/१०/२०१८.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयानुसार राज्यातील अनुसूचित जाती प्रवर्गातील दारिद्र्यरेषेखालील घटकांच्या आर्थिक उन्नतीसाठी तसेच त्यांना स्वयंरोजगाराच्या अधिकाधिक संधी उपलब्ध करून देण्याच्या उद्देशाने रु. २५,००० /- चे कर्ज महामंडळाकडून देण्याची योजना राबविण्यात येत आहे. लहान उद्योगांसाठी लागणा-या भांडवली व पायाभूत गुंतवणुकीतील वाढ, कच्चा माल दरवाढ व सतत होणारी महागाई निर्देशांकातील वाढ पाहता, अनुसूचित जातीच्या जास्तीत जास्त लोकांना कर्ज योजनांचा लाभ घेता यावा आणि महामंडळाच्या योजना प्रभाविपणे राबविता याव्यात ही बाब विचारात घेऊन, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळामार्फत राबविण्यात येणा-या थेट कर्ज योजनेअंतर्गत कर्जाची मर्यादा रु.२५,०००/- वरुन रु.१,००,०००/- पर्यंत वाढविण्याबाबतचे आदेश दि.०५/१०/२०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळामार्फत राबविण्यात येणा-या थेट कर्ज योजनांचा लाभ अनुसूचित जातीच्या जास्तीत जास्त लोकांना घेता यावा आणि महामंडळाच्या योजना प्रभाविपणे राबविता याव्यात ही बाब विचारात घेऊन, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मार्फत राबविण्यात येणा-या थेट कर्ज योजनेअंतर्गत कर्जाची मर्यादा रु.२५,०००/- वरुन रु.१,००,०००/- करण्याबाबतचा दि.०५/१०/२०१८ चा शासन निर्णय या शासन निर्णयाद्वारे अधिक्रमित करण्यात येऊन खालीलप्रमाणे सुधारित आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळामार्फत राबविण्यात येणा-या थेट कर्ज योजनेचे स्वरुप पुढीलप्रमाणे असेल :-

| **प्रकल्प मूल्य** | **रु.१,००,०००/- पर्यंत** |
|---|---|
| महामंडळाचा सहभाग (४ टक्के व्याजदराने) | रु.८५,०००/- (८५ % पर्यंत) |
| अनुदान | रु.१०,०००/- (१० % पर्यंत) |
| अर्जदाराचा सहभाग | रु.५,०००/- (५ % पर्यंत) |
| व्याजदर | ४ % |
| कर्ज परतफेड कालावधी | ३ वर्षे (३६ हप्ते) |
| पहिला हप्ता (७५% रक्कम)<br>(लाभार्थ्याच्या सहभागाची रक्कम वगळून) | रु.७१,२५०/- |
| दुसरा हप्ता (२५% रक्कम)<br>(प्रत्यक्ष उद्योग सुरु झाल्यानंतर साधारणत: ३ महिन्यानंतर क्षेत्रीय अधिका-यांनी केलेल्या तपासणी अभिप्रायानुसार) | रु. २३,७५०/- |

**१. योजनेचा उद्देश:-**

१. मागासवर्गीय घटकातील लोकांना आर्थिकदृष्टया सक्षम करणे. तसेच, बँकेमार्फत कर्ज देताना येणा-या अडचणी व कर्ज मंजूर होताना होणारा विलंब टाळणे,

२. मागासवर्गीय घटकातील सुशिक्षित व शासनाच्या कौशल्य विकास विभागामार्फत, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळामार्फत तसेच शासकीय/निमशासकीय संस्थांमधून तांत्रिक प्रशिक्षण घेतलेली तसेच अनुभवी तरुण मुले/मुली यांना प्राधान्याने स्वयंरोजगारास कर्ज उपलब्ध करुन देणे,

३. मागासवर्गीय दुर्बल घटकांच्या लोकांना लहान /लघु व्यवसाय करण्याकरीता तात्काळ वित्त पुरवठा करणे,

४. सदर योजनेत साधारणपणे समाविष्ट लघु व्यवसाय उदा. मोबाईल सर्व्हिसिंग/रिपेअरींग, इलेक्ट्रीशियन, इलेक्ट्रॉनिक वस्तू रिपेअरिंग (फ्रीज, ए.सी., टि.व्ही., मायक्रोवेव्ह, लॅपटॉप, कॉम्प्युटर हार्डवेअर इ.) ब्युटीपार्लर, ड्रेस डिझायनिंग, टेलरिंग, फुड प्रॉडक्टस् /प्रोसेसिंग, किराणा दुकान, जनरल / स्टेशनरी स्टोअर, मेडिकल स्टोअर, फॅब्रिकेशन/वेल्डींग, हार्डवेअर व सॅनेटरी शॉप, प्रिंटींग, शिवणकला, झेरॉक्स/लॅमिनेशन, हॉटेल, कॅटरिंग सर्व्हिसेस, मंगल कार्यालय, मंडप डेकोरेशन इ., क्रिडा साहित्य/स्पोर्टस् शॉप, फास्ट फूड सेंटर/ज्यूस सेंटर, क्लॉथ / रेडिमेड गारमेंट शॉप, मोटार मेकॅनिक / रिपेअर, शेतीशी निगडीत पूरक/जोडव्यवसाय इ. साठी वित्त पुरवठा करणे.

५. उक्त योजनेत साधारणपणे पुरुष व महिला यांना ५० % आरक्षण, ग्रामीण भागासाठी प्राधान्य राहील. तसेच, राज्य स्तरावरील क्रिडा पुरस्कार प्राप्त व्यक्तींना प्राधान्य राहील,

६. सैन्यदलातील विरगती प्राप्त सैनिकांच्या पत्नी/मुलगा/मुलगी यांना (एकास) प्राधान्य (त्यांचे बाबत आवश्यकता भासल्यास उत्पन्नाची मर्यादा शिथील करण्यात येईल).

**२. लाभार्थ्यांची पात्रता / निकष :-**

१. अर्जदार अनुसूचित जाती व नवबौध्द समाजाचा असावा,
२. अर्जदार महाराष्ट्राचा रहिवासी असावा,
३. अर्जदाराचे वय १८ ते ४५ वर्षे असावे,
४. अर्जदाराचा सिबील क्रेडीट स्कोअर किमान ५०० इतका असावा,
५. अर्जदाराचे एकत्रित कौटुंबिक वार्षिक उत्पन्न रु.३ लाखापेक्षा जास्त नसावे,
६. एका कुटुंबातील एकाच व्यक्तीस सदर योजनेचा लाभ घेता येईल,
७. मागासवर्गीय घटकातील सुशिक्षित व शासनाच्या कौशल्य विकास विभागामार्फत, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळामार्फत तसेच शासकीय/निमशासकीय संस्थांमधून तांत्रिक प्रशिक्षण घेतलेली तसेच अनुभवी तरुण मुले/मुली यांना प्राधान्य,
८. अर्जदाराने आधार कार्ड जोडलेल्या बँक खात्याचा तपशील सादर करावा,
९. अर्जदार महामंडळाच्या कोणत्याही (केंद्र व राज्य) योजनेचा थकबाकीदार नसावा.

**३. अटी व शर्ती :-**

१. ज्या प्रकरणात लाभार्थींना तारण देणे शक्य नसेल त्या प्रकरणात कर्जाचे धनादेश लाभार्थींना न देता उद्योग व्यवसायासाठी जे लाभार्थी ज्यांचेकडून माल/यंत्रसामुग्री खरेदी करतील त्यांचे नांवे कर्जाचे धनादेश देण्यात यावेत. त्याचवेळी अशा लाभार्थींकडून कर्जाच्या परतफेडीच्या रक्कमेचे पुढील दिनांकाचे आगाऊ धनादेश घेण्यात यावेत,
२. सदर कर्जातून लाभार्थींसाठी जी मत्ता निर्माण होणार आहे ती ज्यांच्याकडून निर्माण होईल त्यांचेकडून ती मत्ता अचल (Immovable) असेल तर परस्पर संबंधित मागासवर्ग विकास महामंडळाकडे गहाण (Mortgage) ठेवण्यात यावी. जर ती मत्ता चल (Movable) असेल तर ती महामंडळाकडे तारणगहाण (Hypothecate) करण्यात यावी,
३. कर्ज परतफेडीबाबत लाभार्थींकडून शपथपत्र घेण्यात यावे,
४. या योजनेवर होणारा खर्च शासनाने महामंडळासाठी मंजूर केलेल्या भाग भांडवलाच्या तरतुदीच्या मर्यादेत राहून करण्यात यावा. प्रति वर्षी १००० लाभार्थींसाठी रु.१० कोटीची मर्यादा राहील. यापेक्षा जास्त खर्च अपेक्षित असल्यास शासनाची पूर्वपरवानगी घ्यावी,
५. महामंडळाने आपला भांडवली अर्थसंकल्प विहित कालमर्यादेत शासनाकडून मान्य करुन घेणे बंधनकारक राहील,
६. मुद्दल व व्याजासह कर्जाच्या वसुलीचा तपशील महामंडळाने भांडवली अर्थसंकल्पात देणे बंधनकारक राहील,
७. लाभधारकाने तारणासाठी सादर केलेल्या जामीनदाराकडे दिलेल्या कर्जाइतकी स्थावर मालमत्ता असावी.
८. वसुलीकरीता राष्ट्रीयकृत बँकेच्या कार्यपध्दतीप्रमाणे वसुलीची प्रक्रिया राबविण्यात यावी,
९. लाभार्थ्याने स्थापन केलेल्या व्यवसायाचा विमा स्वखर्चाने उतरविणे तसेच दरवर्षी विम्याचे नुतनीकरण करणे बंधनकारक राहील.

**४. कर्ज वितरण कार्यपद्धती:-**

कर्ज योजनांसाठी योग्य लाभार्थ्यांची निवड करण्याची तसेच महामंडळामार्फत देण्यात येणा-या कर्जाच्या वसुलीची संपूर्ण जबाबदारी जिल्हास्तरीय कार्यालयाची राहील. याबाबत साधारणपणे पुढीलप्रमाणे कार्यपध्दती अनुसरण्यात यावी. त्यामध्ये आवश्यकतेनुसार बदल करण्याचे अधिकार महामंडळास राहतील. या सुधारित योजनेअंतर्गत कर्ज मिळण्यासाठी लाभार्थ्यांना नव्याने अर्ज करावा लागेल.

१. लाभार्थी निवड समितीमार्फत लाभार्थ्यांची निवड करण्यात येईल,
२. महामंडळाच्या जिल्हा स्तरीय कार्यालयातून संपूर्ण कार्यवाही केली जाईल,
३. जिल्हा व्यवस्थापक योजनेचे अंमलबजावणी अधिकारी असतील,
४. महामंडळाचे जिल्हा कार्यालय व जिल्हातील वरीष्ठ अधिकाऱ्यांमार्फत कर्ज प्रकरणासाठी स्थानिक वर्तमानपत्रातून व प्रमूख शासकीय/निमशासकीय कार्यालयातील नोटीस बोर्डावर जाहिरात प्रसिद्ध करण्यात येईल व त्याचवेळी कार्यालयात अर्जाचा नमुना व कागदपत्राची सूची सर्वांना पाहण्यासाठी उपलब्ध करतील,
५. विहित मुदतीत अर्ज Online अथवा Offline किंवा दोन्ही पद्धतीने स्विकारण्यात येतील,
६. कर्ज मागणी अर्जाची मुदत त्या संबंधीत आर्थिक वर्षासाठीच असेल (दि. १ एप्रिल ते ३१ मार्च). तसेच, प्रत्येक वर्षासाठी नव्याने जाहिरात प्रसिद्ध करण्यात येईल,
७. जिल्हा व्यवस्थापक प्राप्त अर्जाची संपूर्ण छाननी/तपासणी करुन पात्र व अपात्र लाभार्थ्यांची यादी तयार करतील. यासाठी पुढील बाबी विचारात घेणे अनिवार्य राहील :-

    अ) उद्योग / व्यवसायाची वर्धनक्षमता,
    ब) लाभार्थ्यांची सक्षमता / व्यवसायाचे ज्ञान,
    क) परतफेडीची क्षमता / जामीनदारांची क्षमता,

८. जिल्ह्यासाठी दिलेल्या उद्दिष्टापेक्षा जास्त अर्ज प्राप्त झाल्यास पात्र लाभार्थ्यांची निवड संगणकीय रॅन्डमायझेशन निवड पद्धतीने (लॉटरी) करून लाभार्थी निश्चित केले जातील,
९. पात्र लाभार्थ्यांना त्या त्या आर्थिक वर्षात महामंडळाकडून कोणत्याही तांत्रिक कारणास्तव कर्ज मंजूर करता आले नाही तर त्या लाभार्थ्यांची प्राधान्य यादी (Seniority List) अथवा प्रतिक्षा यादी (Waiting List) करण्यात येणार नाही अथवा पुढील आर्थिक वर्षात त्यांचा विचार करण्यात येणार नाही,
१०. कर्ज मंजुरी प्रकरणातील आर्थिक वर्षात कार्यवाही पूर्ण करणे आवश्यक असल्याने लाभार्थी निवड समितीच्या बैठका वेळोवेळी घेण्यात येतील.

**५. कर्ज वसुली कार्यपद्धती:-**

१. कर्जाची परतफेड ही कर्ज वितरीत केल्याच्या ९० दिवसांनंतर सुरु करण्यात येईल,
२. कर्ज परताव्याचे मासिक हप्ते ठरवून द्यावेत व कर्ज वसुलीच्या दृष्टीने लाभार्थ्यांकडून पुढील दिनांकाचे आगावू धनादेश घेऊन तसेच ECS (इलेक्ट्रॉनिक क्लिअरंस सिस्टिम) पध्दतीने वसुली करण्यात यावी,
३. एवढे करुनही वसुली न झाल्यास महामंडळाकडे ठेवलेल्या तारणाद्वारे तसेच जामीनाद्वारे कर्ज वसुली करण्यात यावी,

४. जामीनदाराकडून कर्ज वसुली शक्य न झाल्यास जमीन महसूल संहितेच्या कलम २२१ नुसार जिल्हाधिकारी यांना याबाबत माहिती देऊन कर्ज वसुली करण्यात यावी,

५. कर्ज वसुलीकरिता राष्ट्रीयकृत बँकांनी थकीत कर्ज वसुलीसाठी Empanel केलेल्या एजन्सीमार्फत वसुलीची कार्यवाही करण्यात यावी.

६. महामंडळाने एक वर्षांनंतर थेट कर्ज योजनेचा फेर आढावा घ्यावा. यातील लाभार्थ्यांची निवड व वसुलीचे प्रमाण याबाबतच्या यशापयशावर योजना पुढे चालू ठेवण्याबाबतचा निर्णय महामंडळाने घ्यावा. एक वर्षांनंतर याबाबतची सविस्तर माहिती शासनास सादर करावी. सदर योजनेचे समवर्ती मूल्यमापन (Concurrent Evaluation) महामंडळाने करुन घ्यावे. थेट कर्ज योजनेत प्रत्येक आर्थिक वर्षासाठी रुपये १० कोटी खर्च करण्याची मर्यादा राहील.

७. ज्या लाभार्थ्यांनी यापूर्वी घेतलेल्या कर्जाची परतफेड केलेली नाही, अशा लाभार्थ्यांना संपूर्ण परतफेड करेपर्यंत नविन कर्जाचा लाभ घेता येणार नाही. तसेच, जे लाभार्थी परतफेडीच्या कालावधीच्या आत व्याजासह संपूर्ण कर्जाची परतफेड करतील असे लाभार्थी त्यांचा व्यवसाय वाढविण्यासाठी पुन्हा सदर योजनेचा लाभ घेण्यास पात्र राहतील.

८. थेट कर्ज योजनेची परिणामकारक अंमलबजावणी व लाभार्थींना विनातक्रार कर्ज उपलब्ध करण्याच्या अनुषंगाने येणा-या अडचणींबाबत महामंडळाच्या संचालक मंडळाच्या बैठकीत धोरणात्मक निर्णय घेऊन आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी. प्रस्तुत योजनेवरील खर्च महामंडळाकडे उपलब्ध असलेल्या भाग भांडवलातून करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१८१२२११६४८२४९२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil D Sardar

Digitally signed by Sunil D Sardar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aab126657128d7cadca447533, cn=Sunil D Sardar
Date: 2018.12.21 16:56:09 +05'30'

**( सुनिल सरदार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति-** व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (मर्या.), मुंबई,
आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

**प्रत-**

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
२) सर्व सन्माननीय विधानसभा /विधान परिषद सदस्य,
३) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अप्पर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई,
४) मा. मंत्री ( वित्त व नियोजन ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई,
५) मा.मंत्री ( सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) मा.राज्यमंत्री ( सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

७) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८) सह सचिव/अवर सचिव (महामंडळे / अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई/नागपूर,
१०) अधिदान व लेखा अधिकारी / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
११) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई,
१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१३) कक्ष अधिकारी (का.अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
१४) निवडनस्ती (का.महामंडळे).